**राज्यात प्रधानमंत्री आवास योजना - ग्रामीण व इतर ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी बाह्य यंत्रणेकडून १६०० ग्रामीण गृहनिर्माण अभियंते उपलब्ध करुन घ्यावयाच्या व्यवस्थेस मुदतवाढ देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः प्रआयो-२०२०/प्र.क्र.६४/योजना-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ३१ मार्च, २०२३

<u>वाचा :-</u>

१) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : पीएमएवाय-जी-२०१८/प्र.क्र.२४५/योजना-१०, दि.२५.०९.२०१८
२) ग्रामविकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक : प्रआयो-२०२०/प्र.क्र.६४/योजना-१०, दि.१४.०७.२०२०
३) ग्रामविकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक : बामयं/प्र.क्र.३३/वित्त-९, दि.२६.०८.२०२०
४) ग्रामविकास विभाग शासन परिपत्रक क्रमांक : प्रआयो-२०२०/प्र.क्र.६४/योजना-१०, दि.२५.०३.२०२१
५) ग्रामविकास विभाग शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०२०/प्र.क्र.६४/योजना-१०, दि.३१.०३.२०२२

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यात प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण व इतर राज्य पुरस्कृत ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी बाह्य यंत्रणेकडून १६०० ग्रामीण गृहनिर्माण अभियंते उपलब्ध करावयाचे सुधारित धोरण संदर्भ क्र. १ च्या दि.२५.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले आहे. प्रस्तुत व्यवस्थेचा कालावधी दि.३१.०३.२०२० पर्यंत विहित करण्यात आला होता. संदर्भ क्र. २ च्या दि.१४.०७.२०२० च्या शासन परिपत्रकान्वये प्रस्तुत व्यवस्थेच्या कालावधीस दि.३१.०३.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र. ३ च्या दि.२६.०८.२०२० च्या शासन परिपत्रकान्वये, ग्रामविकास विभागात कंत्राटी पध्दतीने मनुष्यबळ सेवा सीएससी ई-गव्हर्नन्स सर्विसेस इंडिया लिमिटेड या केंद्र पुरस्कृत उपक्रमाद्वारे उपलब्ध करुन घेण्याबाबत निश्चित करण्यात आले आहे. तसेच, संदर्भ क्र.४ येथील दि.२५.०३.२०२१ च्या शासन परिपत्रकान्वये व संदर्भ क्र.५ येथील दि.३१.०३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये, सदर व्यवस्थेच्या कालावधीस अनुक्रमे दि.३१.०३.२०२२ पर्यंत व दि.३१.०३.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात

आली असून याबाबतचा आढावा घेऊन या कार्यक्रमास मुदतवाढ देण्याचे निश्चित करण्यात आले होते. त्यानुसार, सदरील व्यवस्थेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक** :-

राज्यात केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण व इतर राज्य शासन पुरस्कृत ग्रामीण गृहनिर्माण योजनांची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी बाह्य यंत्रणेकडून ग्रामीण गृहनिर्माण अभियंते उपलब्ध करावयाच्या व्यवस्थेस दि. ३१.०३.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या दि.२६.०८.२०२० च्या शासन परिपत्रकानुसार ग्रामीण गृहनिर्माण अभियंता यांच्या सेवा सीएससी ई-गव्हर्नन्स सर्विसेस इंडिया लिमिटेड या केंद्र पुरस्कृत उपक्रमाद्वारे उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रस्तुत व्यवस्थेचा आढावा घेऊन या कार्यक्रमास मुदतवाढ देण्याबाबतचा निर्णय घेण्यात येईल.

४. संदर्भाधीन शासन निर्णयातील व परिपत्रकांतील अन्य सर्व बाबी जशाच्या तशा लागू राहतील.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३३११०५२४८०१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Manoj Dattatraya Jadhav

Digitally signed by Manoj Dattatraya Jadhav
DN: cn=Manoj Dattatraya Jadhav, o=Rural Development Department, ou=Central Scheme, email=manoj.jadhav68@nic.in, c=IN
Date: 2023.03.31 15:04:04 +05'30'

(मनोज जाधव)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई

६. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व), मंत्रालय , मुंबई,

७. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व),

८. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच प्रतींसह),

९. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर (पाच प्रतींसह),

१०. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर,

११. सर्व जिल्हाधिकारी,

१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),

१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई

१४. उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व),

१५. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला, दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.

१६. प्रकल्प संचालक ,जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)

१७. अधिक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, प्रशासकीय विभाग (सर्व)

१८. निवड नस्ती (योजना-१०).